केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन (सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली) याबाबत सुधारित कार्यपध्दती अवलंबिणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## आदिवासी विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र.८३/का.६**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-३२.

**दिनांक: १४ ऑक्टोबर, २०२१**

वाचा

१) वित्त मंत्रालय, भारत सरकार यांचे कार्यालयीन ज्ञापन क्र.F.No.१(१३)/ PFMS/ FCD/ २०२०, दि.२३.०३.२०२१ व दि. २ जुलै, २०२१

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२१२१/प्र.क्र.३५/कोषाप्रशा-४, दि.०१.०७.२०२१ व समक्रमांकाचे दि. ६.०८.२०२१ रोजीचे पत्र.

३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२१/प्र.क्र.८३/ कार्यासन-६, दि. २० ऑगस्ट, २०२१.

४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.८४/कोषा प्रशा-५, दि. १५.०९.२०२१ व दि. ०७.१०.२०२१.

प्रस्तावना

केंद्र शासनाच्या संदर्भांकित दि. २३ मार्च, २०२१ रोजीच्या ज्ञापनाव्दारे केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापनासाठी सुधारित सूचना निर्गमित केल्या असून त्यास अनुसरुन वित्त विभागाने संदर्भांकित दि. १ जुलै,२०२१ रोजीच्या परिपत्रकान्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित केलेल्या आहेत. आदिवासी विकास विभागाने यापूर्वी संदर्भांकित दि. २७ जुन, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये केंद्र पुरस्कृत व केंद्र सहाय्यित योजनांकरिता सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीची (PFMS) अंमलबजावणीची कार्यपध्दती विहित केलेली आहे. त्यानुसार संदर्भाधीन क्र. ३ येथील दि. २० ऑगस्ट, २०२१ रोजीच्या शासन निर्णयानुसार केंद्र पुरस्कृत “पोस्ट मॅट्रिक शिष्यवृत्ती” योजनेकरीता समन्वय अधिकारी (Nodal Officer) व राज्य समन्वय यंत्रणा (Single Nodal Agency-SNA) घोषित करण्यात आले आहेत.

केंद्र शासनाने विहित केलेल्या सूचनानुसार सुधारित कार्यपध्दतीचा अवलंब करण्याकरिता आदिवासी विकास विभागामार्फत राबविण्यात येत असलेल्या इतर केंद्र पुरस्कृत योजनांसाठी देखील

समन्वय अधिकारी (Nodal Officer), राज्य समन्वय यंत्रणा (Single Nodal Agency-SNA) व अंमलबजावणी यंत्रणा (Implementing Agency-IAs) घोषित करणे करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

आदिवासी विकास विभागामार्फत राबविण्यात येत असलेल्या खालील केंद्र पुरस्कृत योजनांसाठी पुढीलप्रमाणे समन्वय अधिकारी (Nodal Officer), "राज्य समन्वय यंत्रणा" (Single Nodal Agency) व अंमलबजावणी यंत्रणा (Implementing Agency-IAs) घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | योजनेचा PFMS प्रणालीवरील CODE | योजनेचे नाव व लेखाशिर्ष | समन्वय अधिकारी (Nodal Officer) | "राज्य समन्वय यंत्रणा" (Single Nodal Agency) | अंमलबजावणी यंत्रणा (Implementing Agency-IAs) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | ३३८१ | भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अन्वये केंद्रिय सहाय्य (२२२५ ई०३३) | सह सचिव/ उप सचिव (कार्यासन-१९) | आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक | १. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक<br>२. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.<br>३. व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ, नाशिक<br>४. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास<br>५. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प. |
| २ | ३३८० | केंद्रिय विशेष सहाय्य योजना (केंद्र योजना १०० टक्के) (२२२५ ई०४२) | सह सचिव/ उप सचिव (कार्यासन-१९) | | |
| ३ | २०६८ | आदिम जमातीच्या विकासासाठी केंद्रिय क्षेत्र योजना (केंद्र योजना १०० टक्के) (२२२५ ३००१) | सह सचिव/ उप सचिव (कार्यासन-१९) | | |
| ४ | ३५४८ | नियोजन व संनियंत्रण शाखा-जनजाती संशोधन व प्रशिक्षण संस्था (२२२५ १८६७) | सह सचिव/ उप सचिव (कार्यासन-५) | आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे | आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे |

२. राज्य समन्वय यंत्रणा (Single Nodal Agency-SNA) यांनी त्यांचे स्तरावर योजनानिहाय उपरोक्तप्रमाणे घोषित "अंमलबजावणी यंत्रणा" (Implementing Agency) ची पदनाम निहाय PFMS प्रणालीशी मॅपींग करण्याबाबत कार्यवाही करावी.

३. केंद्र पुरस्कृत योजनेकरीता निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन सुधारित कार्यपध्दतीनुसार निधी प्राप्त होणार आहे. त्यामुळे राज्य समन्वय यंत्रणा (Single Nodal Agency-SNA) यांनी केंद्र पुरस्कृत योजनेच्या निधी वितरण व विनियोग व्यवस्थापनाबाबत वित्त विभागाच्या संदर्भ क्र. २ येथील परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनांनुसार आवश्यक ती कार्यवाही तातडीने करावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०१३११४६२१०९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2021.10.18 15:50:36 +05'30'

**(रविंद्र दि.औटे)**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
२) मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
३) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
४) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
५) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
६) महालेखापाल (लेखापरिक्षण) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर.
७) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
९) सर्व सहसचिव/उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
११) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२)निवड नस्ती (का-६).